**महाराष्ट्र राज्य पोलीस दलातील सहाय्यक पोलीस उपनिरीक्षक/ पोलीस हवालदार / पोलीस नाईक व पोलीस शिपाई यांच्याकरिता पोलीस उपनिरीक्षक पदावर नियुक्तीसाठी मर्यादित विभागीय स्पर्धा (मुख्य) परीक्षा - २०१०**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक - पीएसबी - ०३१० /प्र.क्र.८५४/ पोल-५(अ),**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक ११ ऑक्टोबर, २०११**

**संदर्भ :- शासन परिपत्रक क्र. पीएसबी- ०३१०/प्र.क्र.८५४/ पोल-५(अ),**
**दि. २९ जून, २०११**

**शासन परिपत्रक** :- महाराष्ट्र राज्य पोलीस दलातील **पोलीस उपनिरीक्षक पदावर नियुक्तीसाठी मर्यादित विभागीय स्पर्धा (मुख्य) परीक्षा - २०१०** महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत **दिनांक ६ नोव्हेंबर, २०११** रोजी मुंबईसह औरंगाबाद, नागपूर व पुणे या चार जिल्हाकेंद्रावर घेण्यात येणार आहे. परीक्षेचा कार्यक्रम, अर्ज करण्याची व प्रवेशप्रमाणपत्र उपलब्ध करुन घेण्याची पध्दत सोबत जोडलेल्या **परिशिष्ट - अ -** मध्ये नमूद केली आहे. प्रस्तुत परिपत्रक सहाय्यक पोलीस उपनिरीक्षक, पोलीस हवालदार, पोलीस नाईक व पोलीस शिपाई या संवर्गातील सर्व कर्मचा-यांच्या **(रजेवर/ प्रतिनियुक्तीवर असणा-या कर्मचा-यांसह)** निदर्शनांस आणावे.

हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक संकेतांक २०१११०१११७०२४९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

( सु.ग. सोनवणे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रति,

१) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने).
२) महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
४) संचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो, मुंबई.
५) अप्पर पोलीस महासंचालक, गुन्हा अन्वेषण विभाग (गुन्हे), पुणे
६) आयुक्त, गुन्हा अन्वेषण विभाग (गुप्तवार्ता), मुंबई.
७) विशेष पोलीस महानिरीक्षक, (प्रशिक्षण व खास पथके), मुंबई.
८) विशेष पोलीस महानिरीक्षक, राज्य राखीव पोलीस बल, मुंबई.
९) सर्व पोलीस उपमहानिरीक्षक.
१०) सर्व पोलीस अधीक्षक.
११) सर्व पोलीस आयुक्त, (मुंबई वगळून).

d psi dep main 2010 sh paripatrak

# परिशिष्ट - अ

शासन परिपत्रक क्र. पीएसबी- ०३१०/प्र.क्र.८५४/ पोल-५(अ), दिनांक २९ जून, २०११ नुसार आयोगातर्फे **दिनांक ७ ऑगस्ट, २०११** रोजी घेण्यात आलेल्या **पोलीस उपनिरीक्षक मर्यादित विभागीय स्पर्धा (पूर्व) परीक्षा - २०१०** च्या निकालाआधारे मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी अर्हताप्राप्त ठरलेल्या उमेदवारांची **मुख्य परीक्षा महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत दि. ६ नोव्हेंबर, २०११** रोजी औरंगाबाद, मुंबई, नागपूर व पुणे या ठिकाणी घेण्यात येणार आहे. सदर परीक्षा खालील तीन टप्प्यात घेण्यात येईल :-

१. लेखी परीक्षा :- एकूण ३०० गुण
२. शारीरिक चाचणी :- एकूण १०० गुण.
३. मुलाखत :- एकूण ५० गुण

**२. परीक्षा शुल्क : २.१** अमागास - ४१०/- **२.२** मागासवर्गीय - २१०/-

**२.३** सदर शुल्क माहितीची ऑनलाईन नोंदणी केल्यावर प्राप्त होणा-या विहित चलनाद्वारे भारतीय स्टेट बँकेच्या कोणत्याही शाखेमध्ये कार्यालयीन वेळेत रोखीने भरावे लागेल.

२.४ बँकेमध्ये रक्कम भरल्यानंतर बँकेकडून चलनावर उपलब्ध करुन देण्यात आलेल्या Transaction ID ची नोंद पुन्हा ऑनलाईन पद्धतीने अचूकरित्या केल्याशिवाय अर्ज भरण्याची प्रक्रिया पूर्ण होणार नाही.

**३. मुख्य परीक्षेस प्रवेश :-**

३.१ पोलीस उपनिरीक्षक मर्यादित विभागीय स्पर्धा (पूर्व) परीक्षा -२०१० च्या निकाला आधारे मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या आणि शासन पत्रिपत्रकातील शैक्षणिक अर्हता व अन्य अटींची पूर्तता करणा-या उमेदवारास मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र समजण्यात येईल.

३.२ पूर्व परीक्षेच्या निकालाच्या आधारे मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांनी आयोगाच्या www.mpsconline.gov.in या वेबसाईटवर स्वतःच्या युजर आयडी व पासवर्डद्वारे प्रवेश (Login) केल्यानंतर Apply Exam / Post या बटणावर क्लिक करावे. त्यानंतर पोलीस उपनिरीक्षक मर्यादित विभागीय स्पर्धा (मुख्य) परीक्षा -२०१० वर Apply केल्यावर उमेदवारास त्याच्या पसंतीचे परीक्षा केंद्र (औरंगाबाद, मुंबई, नागपूर, पुणे) निवडावे लागेल. परीक्षा केंद्र निवडल्यानंतर तसेच दिनांक व ठिकाण नमूद केल्यावर Submit to MPSC वर क्लिक करुन आयोगास माहिती सादर करावी.

३.३ वरीलप्रमाणे आयोगास माहिती सादर केल्यानंतर विहित परीक्षा शुल्काचा भरणा करण्यासाठी Print Challan या बटनावर क्लिक करावे व चलनाची प्रत घ्यावी. सदर चलनावर नमूद केल्याप्रमाणे आवश्यक परीक्षा शुल्क चलनासह भारतीय स्टेट बँकेच्या कोणत्याही शाखेत बँकेच्या कार्यालयीन वेळेत रोखपालाकडे सादर करावे व बँकेकडून त्याच वेळी चलनाची प्रत घ्यावी.

३.४ बँकेमध्ये विहित परीक्षा शुल्काचा चलनाद्वारे भरणा केल्यानंतर चलनावर प्राप्त झालेल्या Transaction ID ची नोंद खालीलप्रमाणे करावी :-

(१) बँकेमध्ये रकमेचा भरणा केल्यावर शासकीय कार्यालयीन कामकाजाच्या दोन दिवसानंतर स्वतःच्या युजर आयडी व पासवर्डद्वारे प्रवेश (Login) करुन Apply Exam/Post या बटणावर क्लिक करावे व Update Transaction ID या बटणावर क्लिक करुन बँकेकडून प्राप्त झालेला Transaction ID अचूकपणे नोंदवावा. बँकेकडून प्राप्त झालेल्या Transaction ID ची नोंद अचूकपणे करण्यात आली असेल तरच उमेदवार मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरेल व पुढील प्रक्रिया करता येईल. अन्यथा पुढील कोणतीही कार्यवाही होऊ शकणार नाही.

(२) Transaction ID ची नोंद अचूकपणे केल्यानंतर व नोंदविलेला Trasaction ID वैध असल्यास उमेदवाराला संबंधित जिल्हाकेंद्रावरील आयोगाने निश्चित केलेल्या उपकेंद्रावर प्रवेश देण्यात येईल.

(३) प्रस्तुत परीक्षेच्या अर्ज स्वीकारण्याच्या अंतिम दिनांकानतर एक सप्ताहामध्ये उमेदवारास प्रवेशप्रमाणपत्राची प्रत त्याच्या प्रोफाइलद्वारे उपलब्ध करुन देण्यात यईल. त्यांची प्रत उमेदवारांनी स्वतः डाऊनलोड करुन घेणे आवश्यक आहे.

(४) परीक्षेच्या वेळी उमेदवाराने प्रवेशपत्र आणणे सक्तीचे आहे. त्याशिवाय, परीक्षेस प्रवेश दिला जाणार नाही.

(५) प्रस्तुत परीक्षेच्या प्रवेशासाठी ऑनलाईन पद्धतीने माहिती सादर करणा-या उमेदवारांना अर्जाची प्रत अथवा कोणत्याही प्रकारची कागदपत्रे अथवा ऑनलाईन अर्ज प्रणालीमध्ये असलेल्या शपथपत्राव्यतिरिक्त कोणतेही वेगळे शपथपत्र/ॲफिडेव्हीट आयोगाकडे पाठविण्याची आवश्यकता नाही.

४. विहित पध्दतीने परीक्षा केंद्र निवडून परीक्षा शुल्क भरण्यासाठी चलनाची प्रत घेण्याची कार्यवाही **दिनांक २० ऑक्टोबर, २०११ रोजी २३.५९ वाजेपर्यंत** पूर्ण करणे आवश्यक आहे. त्यानंतर सदर वेब लिंक बंद होईल. चलनाद्वारे शुल्क भारतीय स्टेट बँकेमध्ये **दिनांक २१ ऑक्टोबर, २०११** पर्यत बँकेच्या कार्यालयीन वेळेत भरणे आवश्यक राहील.

५. चलनाद्वारे शुल्क भारतीय स्टेट बँकेमध्ये भरल्यानंतर बँकेकडून प्राप्त होणारा Transaction ID **दिनांक २३ ऑक्टोबर, २०११ रोजी २३.५९ वाजेपर्यंत** अचूकपणे नोंदविणे आवश्यक आहे. त्यानंतर सदर वेब लिंक बंद करण्यात होईल.

६. Transaction ID ची नोंद अचूकरित्या, विहित पद्धतीने व विहित कालावधित न करणाऱ्या उमेदवारास मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र समजण्यात येणार नाही.

७. सदर परिपत्रक जाहिरात आयोगाच्या www.mpsc.gov.in व www.mpsconline.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध आहे.

८. उमेदवारांनी वरीलप्रमाणे कार्यवाही पूर्ण केल्यानंतर आपल्या विभाग/कार्यालय प्रमुखांना कळविणे आवश्यक असून, उमेदवाराचा अर्ज विचारात घेण्यास विभाग/कार्यालय प्रमुखांचा कोणताही आक्षेप असल्यास तसे विभाग/कार्यालय प्रमुखांनी **दिनाक ३१ ऑक्टोबर २०११** पर्यत आयोगास कळविणे आवश्यक आहे. मात्र अर्ज विचारात घेण्यास हरकत नसल्यास आयोगास तसे कळविण्याची आवश्यकता नाही.

९. प्रस्तुत मुख्य परीक्षेचा अभ्यासक्रम आयोगाच्या www.mpsc.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध आहे.

*****